व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील राज्यातील शिल्प कारागीर प्रशिक्षण योजनेतील योजनांतर्गत ९० व आदिवासी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण या योजनेतील योजनांतर्गत ४१४ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२२ ते दिनांक ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०१९/प्र.क्र. ३७/व्यशि-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२२.

वाचा:-

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्र.आयटीआय-१००६ /(४२/०६)/व्यशि-२ दि. २१.०९.२००६
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. बैठक-२०१२/प्र.क्र.१४३/का.१२ दि. ०८.०७.२०१४
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क. दि. २२.०२.२०२२
४) संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई यांचे पत्र क्र. व्यशिप्र-२०२२/आस्था-३/मुदतवाढ/०६६/का.४ दि. २३.०२.२०२२

प्रस्तावना :-

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील राज्यातील शिल्प कारागीर प्रशिक्षण योजनेंतर्गत नवनिर्मित ३२ तालुक्यांमध्ये नवीन औदयोगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्याकरीता मंजूर योजनांतर्गत ५७६ पैकी आदिवासी उपयोजनांतर्गत ९० अस्थायी पदांना संदर्भाधिन (१) च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. व आदिवासी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण या योजनेतील योजनांतर्गत ४१४ अस्थ्यायी पदांना संदर्भाधिन (२) च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयानुसार सदर अस्थायी पदांना दिनांक २२.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधिन (३) येथील शासन निर्णयान्वये दिनांक ०१/०३/२०२२ ते दिनांक ३१/०८/२०२२ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. त्यास अनुलक्षून संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भीय (४) येथील पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील राज्यातील शिल्प कारागीर प्रशिक्षण योजनेंतर्गत नवनिर्मित ३२ तालुक्यांमध्ये नवीन औदयोगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्याकरीता मंजूर योजनांतर्गत ९० अस्थायी पदांना व आदिवासी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण या योजनेतील योजनांतर्गत ४१४ अस्थ्यायी पदांना अस्थायी पदांना (सोबत जोडलेल्या प्रपत्र अ व ब ) दिनांक ०१/०३/२०२२ ते दिनांक ३१/०८/२०२२ पर्यंत चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटी व शर्तीस अधिन राहून मंजूरी देण्यांत येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) उपरोक्त पदे ज्या प्रयोजनासाठी निर्माण करण्यांत आली, त्याच प्रयोजनासाठी पुढे चालू ठेवण्यात यावीत. चालू ठेवण्यात आलेल्या अस्थायी पदांवरील कर्मचारी नियमानुसार मिळणारे वेतन भत्ते इत्यादी मिळण्यास पात्र समजण्यात यावेत.

२) मुदतवाढ दिलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त नाही याची खात्री करून घेण्यात यावी.

३) सदर कालावधीमध्ये मंजूर पदांच्या आढाव्यास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेतलेली आहे. तथापि, त्यानंतर पदनिर्मिती मंजूर झालेली आहे. अशा प्रकरणी नवनिर्मिती पदांच्या समवेक्षनासह पदांच्या आकृतीबंधास मान्यता घेण्याची कार्यवाही विहित कालावधीत पूर्ण करावी.

४) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा प्रश्न उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांची राहील. या कालावधीनंतर आकृतीबंध निश्चित करण्यासाठी कालावधी वाढवून देण्यात येणार नसल्याची कृपया नोंद घ्यावी.

२. या प्रस्तावावर होणारा खर्च सन २०२१-२०२२ व सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात खालील लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

“मागणी क्र. टी-९,२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०२ अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६, जन जाती क्षेत्र उप योजना, ३१ जन जातीक्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत प्रपत्र क मध्ये जोडल्या प्रमाणे जिल्हास्तरावरील उपशीर्ष सांकेतांक TW२७०००३-औद्योगिक प्रशिक्षण संस्था, आदिवासी भागातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार व TW२७०००५ नविन औद्योगिक प्रशिक्षण संस्थांची स्थापना या लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.

उपरोक्त लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पीय अंदाज, सुधारित अंदाज तसेच अंतिम सुधारित अनुदानाचे प्रस्ताव विहित वेळेत सादर करण्याची दक्षता संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभाग यांच्या मान्यतेने तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/ आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३०१६०५००२४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vinod Sheshrao Bondre

Digitally signed by Vinod Sheshrao Bondre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4bd97b779f6f1e9e61491311a06aac663b01b00963f2e754c6ee2d5f7c14953d, serialNumber=c313a8b86d67716d182c41d1e22f57d99c8ee5f4654a216d8fe23b5ad24ed271, cn=Vinod Sheshrao Bondre
Date: 2022.03.30 16:08:24 +05'30'

**( विनोद बोंदरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सर्व संबंधित सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय (संचालनालयामार्फत).
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी. (संचालनालयामार्फत).
८. अवर सचिव/कक्ष अधिकारी (व्यशि-१)/(व्यशि-४), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११.कार्यासन अधिकारी (का.९), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.

| प्रपत्र -अ | | | | |
|---|---|---|---|---|
| शिल्प कारागिर प्रशिक्षण योजनांतर्गत नवनिर्मित ३२ तालुक्यांमध्ये नवीन शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांपैकी आदिवासी उपयोजना क्षेत्रातील ५ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील ९० अस्थायी पदे योजनांतर्गत अस्थायी पदे | | | | |
| अ.क्र. | पदनाम | ७व्या वेतन आयोगानुसार वेतनस्तर | | पदांची संख्या |
| | गट-ब | | | |
| १ | प्राचार्य | एस-१७ | रु.४७६००-१५१११०/- | ५ |
| | एकूण गट-ब | | | ५ |
| २ | गटनिदेशक | एस-१५ | रु.४१८००-१३२३००/- | ५ |
| ३ | शिल्प निदेशक | एस-१४ | रु.३८६००-१२२८००/- | ४० |
| ४ | गणित चित्रकला निदेशक | एस-१४ | रु.३८६००-१२२८००/- | ५ |
| ५ | वरिष्ठ लिपिक | एस-८ | रु.२५५००-८११००/- | ५ |
| ६ | कनिष्ठ लिपिक | एस-६ | रु.१९९००-६३२००/- | ५ |
| ७ | सहाय्यक भांडारपाल | एस-६ | रु.१९९००-६३२००/- | ५ |
| | एकूण गट-क | | | ६५ |
| | गट-ड | | | |
| ८ | शिपाई | एस-१ | रु.१५०००-४७६००/- | ५ |
| ९ | चतुर्थश्रेणी कर्मचारी | एस-१ | रु.१५०००-४७६००/- | १५ |
| | गट-ड | | | २० |
| | **एकूण** | | | ९० |

| प्रपत्र ब<br>“आदिवासी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण" या योजनेतील योजनांतर्गत ४१४ अस्थायी पदे | | | | |
|---|---|---|---|---|
| अ. क्र. | पदनाम | ७ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | | पदांची संख्या |
| १ | प्रकल्प अधिकारी | एस-१७ | रु. ४७६००-१५१११०/- | २८ |
| २ | गट निदेशक | एस-१५ | रु. ४१८००-१३२३००/- | २ |
| ३ | शिल्प निदेशक | एस-१४ | रु. ३८६००-१२२८००/- | २७५ |
| ४ | शिल्प निदेशक (डेंटल लॅब टेक्निशियन) | एस-१४ | रु. ३८६००-१२२८००/- | ६ |
| ५ | सहायक अधिव्याख्याता | एस-१४ | रु. ३८६००-१२२८००/- | ३९ |
| ६ | गणित चित्रकला निदेशक | एस-१४ | रु. ३८६००-१२२८००/- | २८ |
| ७ | वसतिगृह अधिक्षक तथा लिपिक | एस-१० | रु. २९२००-९२३००/- | २ |
| ८ | वरिष्ठ लिपिक तथा भांडारपाल | एस-८ | रु. २५५००-८११००/- | २८ |
| ९ | वसतिगृह पहारेकरी | एस-१ | रु. १५०००-४७६००/- | ६ |
| | **एकूण** | | | **४१४** |